# लुई ब्रेल
## (चित्र पुस्तक)

लेखक: डेव्हिड अॅडलर

चित्रे : जॉन व अॅलेक्झांड्रा वॉल्नर

मराठी अनुवाद : तृप्ती कर्णिक

# लुई ब्रेल - चित्र पुस्तक

लेखक: डेव्हिड ॲडलर

चित्रे : जॉन व ॲलेक्झांड्रा वॉल्नर

मराठी अनुवाद : तृप्ती कर्णिक

लुई ब्रेलचा जन्म ४ जानेवारी १८०९ मध्ये फ्रान्समधील पॅरिस शहराजवळच्या टेकड्यांनी वेढलेल्या कुपरे ह्या गावात झाला. लुईचे वडील सायमन रेने ब्रेल हे घोड्याचे खोगीर बनवणारे कारागीर होते. आईचे नाव मोनिका बॅरॅन ब्रेल होते. त्यांना चार मुले होती. लुई  सर्वात धाकटे अपत्य होते.

ब्रेल कुटुंबियांचे तीन खोल्यांचे दगडी घर होते. शेतातल्या आणि द्राक्ष्यांच्या बागेतल्या भाज्या व अन्नधान्य ते रोजच्या जेवणात वापरत. बागेच्या शेजारी वडिल सायमन रेने ह्यांचे वर्कशॉप होते. तिथे मोठे बाकडे, चामड्याचे तुकडे, धारदार चाकू, हातोडी, टोकदार आरे असे सगळे साहित्य असे. वडील जेव्हा तिथे काम करीत तेव्हा बरेचवेळा छोटा लुई तिथल्या टाकून दिलेल्या छोट्या चामड्याच्या तुकड्यांबरोबर खेळत बसे.

उन्हाळ्याचे दिवस होते. एके दिवशी वडील गिऱ्हाईकाशी गप्पा मारीत बाहेर बसले होते. तीन वर्षांचा छोटा लुई वर्कशॉपमधे खेळत होता. त्याने तिथे पडलेले धारदार आरे घेतले आणि वडिलांच्या कामाची नक्कल करू लागला. पण ते टोकदार हत्यार नेमके त्याच्याकडून सटकले आणि डोळ्याला लागले.

लुई जोराने किंचाळला. आई-बाबा पळतच त्याच्याकडे आले. त्यांनी त्याच्या डोळ्यातून वाहत असलेले रक्त साफ केले आणि त्यावर बँडेज लावले.

आई-बाबा लुईला घरगुती उपचार करणाऱ्या एका आजीबाईकडे घेऊन गेले. तिने जखमेवर तात्पुरता इलाज म्हणून लिलीचे पाणी लावले. त्यानंतर ते त्याला डॉक्टरकडे घेऊन गेले. पण डोळ्याची दुखापत गंभीर होती. त्यावर काही उपचार करण्यासारखे नव्हते. एका डोळ्याचे इन्फेक्शन थोड्याच वेळात दुसऱ्या डोळ्यातही पसरले. आणि काही वेळात लुईच्या दोन्ही डोळ्याची दृष्टी गेली.

स्वतःच्या हाताने कसे जेवायचे आणि न धडपडता कसे चालायचे हे लुईला पुन्हा एकदा शिकावे लागले.

बाबांनी लुईसाठी वेताची छडी बनवली. लुई चालताना ती काठी आपटून रस्ता चांगला आहे न हे तपासून पाही. कुठे जायचे झाले कि लुई जाताना पाऊले मोजून ठेवायचा. म्हणजे परत येताना ते लक्षात ठेवून तेवढेच अंतर बरोबर चालायचा.

लुईच्या आयुष्यात आता पूर्ण अंधार भरून राहिला होता. परंतु आवाज, वास, आकार आणि वस्तूंचा स्पर्श ह्या संवेंदना मात्र तीव्र झाल्या होत्या. त्याला लोकांच्या चालण्याच्या आवाजातील फरक कळायला लागला. घराच्या बाहेर घोडागाडी थांबली की दगडावरून चाकांचा आवाज ह्यायचा त्यावरून त्याला घरी कोण येत आहे हे अचूक ओळखता येऊ लागले.

सन १८०० च्या सुरुवातीला फ्रान्स लढाईत गुंतला होता. फ्रान्सचा सम्राट नेपोलियन ह्याने युरोप व रशियामध्ये मोठ्या प्रमाणात सैन्य पाठवले होते. सुरुवातीला त्ते जिंकत पुढे आगेकूच करत होते. परंतु १८१४ नंतर मात्र फ्रेंचांचा पराभव होऊ लागला. सैन्य घरी परतू लागले.

एप्रिल १८१४ मध्ये शत्रूसैन्याने म्हणजे रशियाने कुपरेवर हल्ला चढवला. त्यांनी तिथल्या घरांमध्ये आश्रय घेतला. जबरदस्तीने त्त्यांच्या खाण्यापिण्याची सोय करावी लागे. पुढील दोन वर्षे अनेक रशियन सैनिक लुईच्या घरी राहून गेले. ज्यांना आपण बघू शकत नाही किंवा काहीही संबंध नाही अशा अनोळखी लोकांची लहानग्या लुईला खूप भीती वाटे.

१८१५ साली कुपरेमध्ये जॅक पल्यू नावाचे नवीन धर्मगुरू आले. ते लुईचे पहिले शिक्षक होते. त्यांनी लुईला बायबल शिकवले. आवाजावरून प्राणी तसेच वास व स्पर्शाने फुले कशी ओळखायची हेही त्यांनी लुईला शिकवले.

लुईच्या वडिलांनी एका लाकडी फळीवर खिळे ठोकून अक्षरे तयार केली. लुई त्या खिळ्याच्या आधारे अक्षरओळख शिकला. वडिलांनी त्यानंतर अक्षरे जोडून शब्द बनवायला शिकवले.

पुढील वर्षी अँटनी बेचेरेट नावाचे नवीन शिक्षक कुपरेच्या शाळेत रुजू झाले. त्या काळी अंध मुलांनी शाळेत जाणे ही नवलाची गोष्ट होती. पण लुई हुशार मुलगा होता. आणि अँटनी बेचेरेटनाही लुईला शिकवण्याची उत्सुकता होती.

लुईला फक्त जे कानावर पडेल त्यातूनच शिकावे लागे. इतर मुले पुस्तके वाचू शकत तसे लुईला शक्य नव्हते. परंतु तो एक हुशार विद्यार्थी होता आणि त्याच्या घराची आर्थिक परिस्थितीही चांगली होती.

फेब्रुवारी १८१९ मध्ये त्याने पॅरिसच्या नॅशनल स्कूल फॉर ब्लाइंड ह्या निवासी शाळेत प्रवेश घेतला. ही अंधांसाठीची जगातील पहिली शाळा होती. तिची स्थापना १७८४ साली व्हॅलेंटीन हुये यांनी केली होती.

लुईने शाळेत प्रवेश घेतला तेव्हा शाळेची इमारत फरची चांगली नव्हती. पाचमजली शाळेच्या सर्व खिडक्यांना लोखंडी जाळ्या होत्या. पस्तीस वर्षांपूर्वी फ्रेंच राज्यक्रांतीच्या काळात ही इमारत तुरुंग म्हणून वापरली जात होती. लुई ब्रेलसाठी पुढे शाळा हेच कायमचे घर बनले.

त्या संस्थेमध्ये मोठे वाचनालय होते. वाचनालयातील पुस्तकांतील अक्षरे स्पर्शाने वाचता येतील अशी होती. अक्षरे खूप मोठी असायची त्यामुळे पुस्तके आकाराने खूप मोठी आणि जड असायची. एकेक अक्षर स्पर्शाने वाचणे म्हणजे खूप वेळ जाई. त्याला P व R, E व F अशा अक्षरांमधील फरक काळजीपूर्वक लक्षात ठेवायला लागे. पण निदान लुई वाचू शकत होता हेच खूप मोठे होते.

तिथे कला, संगीत शिकवायचे त्याबरोबरीने इतिहास, भूगोल, गणित, लॅटिन, व्याकरण हे विषयही असत. लुईला संगीतात अधिक रुची होती. त्यामुळे पियानो, ऑर्गन, व्हायोलिन, चेलो ही वाद्ये तो आवडीने शिकला. १८३४ सालच्या सुरुवातीला तो पॅरिसमधील काही चर्चमध्ये ऑर्गन वाजवू लागला.

१८२१ मध्ये लुई सोनोग्राफी शिकला. सोनोग्राफी म्हणजे अंधारात हाताच्या स्पर्शाने वाचता येईल अशी बिंदू आणि रेषांनी बनलेली सांकेतिक भाषा. फ्रेंच सैन्याधिकारी चार्लस बार्बीयर ह्याने सैनिकांना रात्रीच्या अंधारात दिव्याशिवाय वाचता येईल अशी भाषा तयार केली होती. सैनिक ह्या भाषेत निरोपांची देवाणघेवाण करायचे.

लुईला सोनोग्राफीची लिपी खूप आवडली. तो ती लिहायला वाचायला शिकला. परंतु ह्या लिपीतील त्रुटी त्याच्या लगेच लक्षात आल्या.

फक्त एक अक्षर मांडायचे म्हटले तरी त्यासाठी खूप बिंदू असायचे. नंबर किंवा विरामचिन्हे तर ह्या भाषेत नव्हतीच. सोनोग्राफी ही आवाजावर आधारित भाषा होती. त्यामुळे प्रत्येक आवाजाला त्यात चिन्ह होते परंतु शब्दासाठी मात्र नव्हते. त्यामुळे लुईला अक्षरे बरोबर मांडता यायची नाही.

लुईने स्वत:च भाषा बनवायचे ठरवले. त्यासाठी त्याचे प्रयोग सुरु केले. सगळे मित्र झोपले की त्याचे काम सुरु होई ते रात्री उशिरापर्यंत चाले. पुन्हा सकाळी लवकर उठून शाळा सुरु होण्याआधीही त्याचे काम सुरुच असे. खूप परिश्रमाने १८२४ साली लिपी तयार झाली. त्याचे प्रात्यक्षिक त्याने शाळेचे मुख्याधापक डॉ. आन्द्रे पिग्निअर ह्यांना दाखवले.

डॉमिनोच्या खेळात सहा बिंदू असतात त्याप्रमाणे लुईने दोन रांगेत तीन उभट टिंब वापरले. त्याने प्रत्येक अक्षर, विरामचिन्हे, अंक, गणिती चिन्हेसाठी उभट टिंब वापरून ६३ प्रकार बनवले. नंतर त्याने संगीत नोटेशनही ह्या लिपीत तयार केले.

ब्रेलने तयार केलेली लिपी शिकायला तसेच वाचायला सोनोग्राफीपेक्षा खूप जास्त सोपी होती.

लुई ब्रेल आणि त्याचा मित्र गॅब्रियल कॉथियर ह्या दोघांनी मिळून ब्रेलमधील पहिला लेखन बोर्ड बनवला. त्यामुळे आता लुई, गॅब्रियल आणि त्यांचे अंध मित्र ह्यांना आता लिहिणेही शक्य झाले.

१८२६ मधे त्याच नॅशनल इन्स्टिट्यूटमधे लुईची सहायक शिक्षक म्हणून तर दोन वर्षानंतर पूर्ण वेळ शिक्षक म्हणून  नियुक्ती झाली. तो गणित, भूगोल, व्याकरण आणि संगीत हे विषय शिकवायचा. मुलांना समजले नाही की इतर शिक्षक त्यांना ओरडायचे पण लुई मात्र मुलांशी खूप प्रेमाने आणि आस्थेने वागायचा.

सुरुवातीला दृष्टी असलेल्या बऱ्याच लोकांनी ब्रेलने तयार केलेल्या लिपीला खूप विरोध केला. नवीन लिपी म्हणजे अंधांसाठी खास नवीन पुस्तके छापावी लागणार. त्यासाठी जास्त पैसे खर्च करावे लागतील. दृष्टी असलेल्या लोकांना जुन्या प्रचलित पुस्तके चालणार होती. कारण त्यांना ती सहज वाचता येत होती आणि त्यातल्या बदलाची त्यांना काहीच गरज नव्हती.

नॅशनल इन्स्टिट्यूटने जुनीच पुस्तके सुरु ठेवली. परंतु काही विद्यार्थ्यांनी आपणहून लुईच्या ब्रेल भाषेचा वापर करून पाहिला. सोयीचे असल्यामुळे त्यांना ती खूपच आवडली. डॉ. पिग्निअर ह्याची इच्छा होती की शाळेत ह्याच लिपीचा वापर व्हावा. एवढेच नव्हे तर संपूर्ण फ्रान्समध्ये अंधांसाठी ही अधिकृत भाषा म्हणून जाहीर करावी असे त्यांना वाटत होते. परंतु नॅशनल इन्स्टिट्यूटच्या संचालकांचा त्याला विरोध होता. १८४० मध्ये ब्रेलमध्ये छापलेली पुस्तके शाळा वापरते आहे हे कळल्यावर त्यांनी डॉ. पिग्निअर ह्यांची नॅशनल इन्स्टिट्यूटमधून हकालपट्टी केली.

दृष्टी असलेल्या लोकांना टिंबाची ब्रेल भाषा शिकता येत नव्हती. अंध व्यक्ती दृष्टी असलेल्या लोकांना समजेल असे लिहू शकत नव्हते. म्हणून १८३९ मध्ये लुईने उभट बिंदू वापरून अक्षरांचे आकार बनवले ज्याला रॅफिग्राफी असे नाव दिले. त्यामुळे आता अंध लोक स्पर्शाने अक्षर ओळखू शकत होते तर दृष्टी असलेले लोक ते अक्षर पाहून वाचू शकत होते.

भाषा सोपी करण्यासाठीचे लुईचे काम सुरूच होते आणि त्याबरोबरीने शिक्षक म्हणून त्याची नोकरी चालूच होती. पण तास चालू असताना मधेच खोकल्याची इतकी जोरदार उबळ यायची की शिकवणे त्याला थांबवावे लागे. १८३५ मध्ये खोकलाचे निदान जीवघेण्या क्षयरोगात झाले. अशक्तपणामुळे त्याला कधीकधी शिकवता येणे अशक्य व्हायचे. त्यावेळी आराम करण्यासाठी आणि गावाकडच्या शुद्ध हवेसाठी अधूनमधून तो कुपरेला आपल्या घरी जाई.

१८५१ मध्ये लुईची तब्येत खूप जास्त खालावली. अंथरुणावर खिळून होता. तो आपल्या मित्रांना म्हणाला, “माझे पृथ्वीतलावरील कार्य पूर्ण झाले आहे.” त्रेचाळीसावा वाढदिवस झाल्यावर लगेच दोन दिवसात ६ जानेवारी १८५२ रोजी त्याने प्राण सोडले.

लुईचे अंधांसाठीचे महान कार्य १८५२ सालापर्यंत लोकांना फारसे माहित नव्हते. परंतु १९ शतकाच्या शेवटी त्याने विकसित केलेली सहा टिंबाची भाषा जगभरात अनेक भाषांमध्ये "ब्रेल लिपी" म्हणून वापरात येऊ लागली.

अंध व मुकबधीर हेलेन केलरने लुईचे वर्णन "महान व्यक्ती, दैवी प्रतिभावंत आणि विशाल हृदयाचा" असे केले आहे. तिने ब्रेलमध्ये लिहून ठेवले आहे,"त्याच्यामुळे मला वाचनाचा आनंद घेता आला आणि त्यातून जगातल्या सुंदर गोष्टींचा खजिना माझ्यासाठी खुला झाला....." "लुई ब्रेल ह्याने  बांधलेल्या सेतूमुळे लाखो अंध अपंग लोक अंधारमय जीवनातून अनादी आनंदी जीवनाकडे प्रवास करू शकले."

## लेखकाचे मनोगत

आजच्या काळात जर लुई ब्रेलसारखी डोळ्याची जखम झाली तर योग्य उपचाराने ती बरी होऊ शकते व दृष्टिहीन होण्यापासून वाचू शकतो. ज्या क्षयरोगामुळे लुईचा मृत्यू झाला त्यावरही आता यशस्वी उपाय सापडले आहेत.

लुई ब्रेलनी सर्वात आधी टिंब आणि रेषा वापरून भाषेचे प्रयोग केले पण फक्त टिंब वापरणे जास्त सोपे आहे हे त्याच्या लक्षात आले तेव्हा त्याने रेषा वापरणे सोडून दिले.

१९५२ मध्ये त्याची शंभरावी जन्मतिथी झाली. त्यावेळी लुई ब्रेलचे उर्वरित अवशेष पँथेआन, पॅरिस इथे हलवण्यात आले. आणि फ्रान्समधील अनेक थोर व्यक्तींच्या शेजारी तो विसावला.

**महत्वाच्या घटना:**

१८०९: ४ जानेवारीला फ्रान्समधील कुपरे गावात जन्म

१८१२: वडिलांच्या दुकानात झालेल्या दुर्घटनेमुळे कायमचे अंधत्व

१८१९: नॅशनल इन्स्टिट्यूट फॉर ब्लाइंड चिल्ड्रेन, पॅरिस इथे प्रवेश

१८२४: उभट टिंब वापरून मुळाक्षरे बनवण्याचे काम पूर्ण

१८२६: नॅशनल इन्स्टिट्यूटमधे सहायक शिक्षक म्हणून नियुक्ती

१८३५: क्षयरोगाचे निदान

१८३९: रेफिग्राफीचा शोध त्यात उभट टिंब वापरून वर्णमाला बनवली. ह्यामुळे अंध लोकांना सहा टिंबांची भाषा वापरून दृष्टी असलेल्या लोकांसाठी लेखन शक्य

१८५२: ६ जानेवारीला पॅरिस इथे मृत्यू